**कोरोना आजारामुळे केलेल्या टाळेबंदीमुळे कोटा, राजस्थान येथे शिक्षणासाठी गेलेल्या महाराष्ट्र राज्यातील विद्यार्थ्यांना राज्यात परत आणण्यासाठी झालेल्या खर्चाच्या प्रतिपूर्तीपोटी महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास रु.९९,८९,६८०/- इतकी रक्कम प्रदान करण्याबाबत-**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एसटीसी-०७२०/प्र.क्र.३१३/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ ऑगस्ट, २०२०.

वाचा :-

१) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.मा.प.म. यांचे पत्र क्र.राप/वाह/सामान्य/१७५२, दिनांक ०८.०५.२०२०.

**शासन निर्णय:-**

कोरोना विषाणूचा प्रादुर्भाव रोखण्यासाठी संपूर्ण देशात टाळेबंदी जारी करण्यात आली होती. सदर टाळेबंदीमुळे कोटा, राजस्थान येथे शिक्षणासाठी गेलेल्या व तेथेच अडकून पडलेल्या महाराष्ट्र राज्यातील मुलांना महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या ७२ बसेसमार्फत राज्यामध्ये परत आणण्यात येवून त्यांना त्यांच्या जिल्हयामध्ये सुखरुप पोहोचविण्यासाठी राज्य परिवहन महामंडळास झालेल्या खर्चाची रक्कम रु.९९,८९,६८०/- (अक्षरी नव्व्यान्नव लाख एकोणनव्वद हजार सहाशे ऐंशी फक्त) सन २०२०-२०२१ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून प्रदान करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा आणि सदर खर्च “मागणी क्रमांक बी-३, २०४१, वाहनांवरील कर ००, ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य), (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१२६/२०२०/व्यय-८, दि.१९.०६.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८०७१५१२१८०१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KADAM
DATTATRAY
HANMANT

Digitally signed by KADAM DATTATRAY HANMANT
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=cf316337e92d3c54da432222208093bfc6ed1d1570f094663515273d0b4d27fc, postalCode=400032,
street=HOME DEP.MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=a923979cf886d5724fbed87cd57745c3f72eba57b0d277f11e970f0aaca99802, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=KADAM DATTATRAY HANMANT
Date: 2020.08.07 16:17:15 +05'30'

**( द. ह. कदम )**

अवर सचिव, गृह (परिवहन) विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
३. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
४. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
८. वित्त विभाग (व्यय -८/साऊ/ अर्थसंकल्प-११/अर्थोपाय) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४) मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती/परि १.